**सराय ( धर्मशाळा) मौजे. चंद्रपूर, ता.जि. चंद्रपूर हे राज्य संरक्षित स्मारक म्हणून घोषित करणेबाबतचा प्राथमिक अधिसूचनेचा प्रस्ताव.**

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : रासंस्मा-२०२५ /प्र.क्र.१८/सां.का.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ एप्रिल, २०२५

**<u>शासन निर्णय</u> :-**

सराय ( धर्मशाळा) मौजे. चंद्रपूर, ता.जि. चंद्रपूर हे राज्य संरक्षित स्मारक म्हणून घोषित करणेबाबत विहीत कार्यपध्दतीची प्रक्रिया पूर्ण झाली असल्याने व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, चर्नी रोड, मुंबई यांना या शासन निर्णयाव्दारे निर्देश देण्यात येत आहेत की, या निर्णयाची सोबतची प्राथमिक अधिसूचना मराठी व इंग्रजी भाषेत महाराष्ट्र शासन सर्वसाधारण राजपत्र भाग-४ मध्ये प्रसिध्द करावी व सदर अंतिम अधिसूचनेच्या ३० प्रती अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई व संचालक, पुरातत्व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना पाठविण्यात याव्यात.

०२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी सदरहू प्राथमिक अधिसूचनेची प्रत स्मारकाजवळ ठळक ठिकाणी लावण्याची व्यवस्था करावी.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४१५१६४२१०४०२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D931702558094468 5E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2025.04.15 16:43:38 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, चर्नी रोड, मुंबई ४०० ००४.
२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई.
३. सहायक संचालक, पुरातत्व विभाग,नागपूर.
४. विभागीय आयुक्त,नागपूर.
५. जिल्हाधिकारी,चंद्रपूर.
६. जिल्हा कोषाधिकारी,चंद्रपूर.
७. निवड नस्ती, सां.का.३

# अधिसूचना

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा
राजगुरू चौक
मुंबई - ४०० ०३२
दि. १५ एप्रिल, २०२५

**महाराष्ट्र प्राचीन स्मारके व पुराणवस्तुशास्त्र विषयक स्थळे व अवशेष अधिनियम, १९६०**

क्रमांक: रासंस्मा-२०२५/ प्र.क्र. १८ /सां.का.३
ज्याअर्थी सोबतच्या अनुसूचित वर्णन केलेले प्राचीन ऐतिहासिक स्मारक (यात यापुढे ज्याचा असे स्मारक असा निर्देश करण्यात आला आहे) हे संरक्षित स्मारक असावे असे शासनाचे मत आहे.

ज्या अर्थी, सोबतच्या वर्णन केलेले प्राचीन व ऐतिहासिक स्मारक हे संरक्षित स्मारक असावे असे महाराष्ट्र शासनाचे मत आहे;

त्या अर्थी आता, महाराष्ट्र प्राचीन स्मारके व पुराणवस्तुशास्त्र विषयक स्थळे व अवशेष अधिनियम, १९६० (सन १९६१ चा महाराष्ट्र अधिनियम १२) याचे कलम ४, पोटकलम (१) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे उक्त स्मारक हे संरक्षित असल्याचे जाहीर करण्याच्या आपल्या इराद्याची दोन महिन्यांची नोटीस याव्दारे देत आहे.

उक्त स्मारकात हितसंबंध असलेल्या कोणत्याही व्यक्तीला ही अधिसूचना शासकीय राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या तारखेपासून दोन महिन्यांच्या आत उक्त स्मारक हे संरक्षित असल्याच्या घोषणेस हरकत येता येईल आणि पूर्वोक्त मुदत संपण्यापूर्वी अशा प्रकारची कोणतीही हरकत मा. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य), महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ यांचेकडे येईल तिचा शासन विचार करील.

# अनुसूची

**स्थान :** चंद्रपूर **तालुका :** चंद्रपूर **जिल्हा :** चंद्रपूर

**गट क्रमांक :** १६६३

| | | |
|---|---|---|
| **स्मारकाचे नांव** | : | सराय (धर्मशाळा) |
| **मालकी** | : | महानगरपालिका, चंद्रपूर |
| **तपशील** | : | चंद्रपूर शहरात येणाऱ्या महत्वपूर्ण व्यक्तींच्या निवासाकरिता सन १९२१ मध्ये या सरायची निर्मिती सुरु झाली होती. चंद्रपूरचा ऐतिहासिक वारसा कथन करणारी तथा सांस्कृतिक व राजकीय घडामोडीचे दर्शन घडविणारी ही महत्त्वपूर्ण वास्तु आहे. समलंब चौकोणी आकाराच्या या वास्तूचे निर्माण दगड, विटा व लाकडापासून झालेले आहे. द्विमजली या इमारतीच्या तळमजल्यावर चार खोल्या असून इमारतीच्या मधोमध मुख्य प्रवेशद्वार व समोर वरांडा आहे. वरील मजल्यावरही याच प्रकारची स्थापत्य रचना आहे. या वास्तूवर ब्रिटीश व भारतीय वास्तुकलेचा प्रभाव दिसून येतो. |
| **संरक्षित करावयाच्या स्मारकाचे क्षेत्रफळ** | : | सराय (धर्मशाळा) लांबी १९.०० मी x रुंदी ११.७० मी<br>एकूण क्षेत्रफळ २२२.३० चौ.मी. |
| **संरक्षित करावयाचे एकूण क्षेत्रफळ (स्मारकासह)** | : | लांबी ३४.०० मी x रुंदी २०.०० मी<br>एकूण क्षेत्रफळ ६८० चौ.मी (स्मारकासह) |
| **संरक्षित करावयाच्या क्षेत्राच्या चतु:सीमा** | : | पूर्व - खुली जागा<br>पश्चिम - रोड<br>उत्तर - दुकान चाळ<br>दक्षिण - खुली जागा. |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2025.04.15 16:44:09 +05'30'

(नंदा राऊत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

# NOTIFICATION

**Tourism and Cultural Affairs Department**
**Mantralaya, Madam Cama Marg,**
**Mumbai - 400 032**
**Dated: 15 th April, 2025**

**Maharashtra Ancient Monuments and Archaeological sites and Remains Act, 1960**

No: Rasansma 2025/C.R. 18/ Sanka3

Whereas the Government of Maharashtra is of the opinion that the ancient and historical Monument described in the Schedule here to (here in after referred to as ″the said Monument″) should be a Protected Monument;

Now, therefore, in exercise of the powers conferred by sub-section (1) of section 4 of the Maharashtra Ancient Monuments and Archaeological Sites and Remains Act, 1960 (Mah. XII of 1961), Government of Maharashtra here by gives two months' notice of the intention to declare the said Monument to be a Protected Monument.

Any person interested in the said Monument, may within two months from the date of publication of this notification in the Official Gazette, object to the declaration of the said Monument to be a Protected Monument;

Any such objection which may be received by the Hon'ble Additional Chief Secretary (Cultural Affairs), Government of Maharashtra, Mantralaya, Mumbai - 400032, before the expiry of the aforesaid period of two months will be considered by the Government.

<u>**SCHEDULE**</u>

**Locality** : Chandrapur **Taluka** : Chandrapur **District** : Chandrapur
**Gat Number**. : 1663

| | | |
|---|---|---|
| **Name of the Monument to be Protected** | : | Sarai (Rest House) |
| **Ownership** | : | Municipal Corporation, Chandrapur |
| **Particulars** | : | The construction of this Sarai was initiated in 1921 to accommodate important visitors to Chandrapur. This monument narrates the historical heritage of Chandrapur and displays its cultural and political significance. This trapezoidal structure is made of stone, brick and wood. There are four rooms on the ground floor of this two-story building and a main entrance in the middle of the building with a verandah in the front. The above floor also has the same type of architectural structure. This monument is an excellent example of the Indian and British period architecture. |
| **Area of the Monument to be Protected** | **:** | Sarai (Rest House): Length 19.00 m x Width 11.70 m<br>Total Area: 222.30 sq. m |
| **Total Protected Area (including the Monuments)** | : | Length 34.00 m x Width 20.00 m<br>Total Area: 680 sq. m (including the monument) |
| **The Boundaries of the Area to be Protected** | : | East : Open space<br>West : Road<br>North: Shops and a residential block<br>South: Open space. |

By Order and in the name of the Governor of Maharashtra,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2025.04.15 16:44:42 +05'30'

**(Nanda Raut)**
**Deputy Secretary to Government**